श्री.श.बा.चव्हाण,वरिष्ठ तंत्र सहाय्यक
यांना तांत्रिक अधिकारी (गट-ब)
(राजपत्रित) या पदावर पदोन्नती देण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**

**उद्योग, उर्जा व कामगार विभाग**

**शासन आदेश क्रमांकः एसबीई-०२/२०१०/प्र.क्र.७/कामगार-१**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक

मंत्रालय, मुंबई -४०० ०३२

तारीख: १८ फेब्रुवारी, २०१५

**संदर्भ :-**

१) उद्योग, उर्जा व कामगार विभाग शासन निर्णय क्रमांकः एसबीई-०२/२०१०/प्र.क्र.७ /कामगार-१, दिनांक २६/०३/२०१३.

२) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्रमांकः एसबीई-०२/२०१०/प्र.क्र.७ /कामगार-१, दिनांक २६/०२/२०१४.

३) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, अधिसूचना क्रमांकः एसबीई-१०२००४/प्र.क्र.१६०२ /कामगार-१, दिनांक २१ जुलै, २०१४.

४) बाष्पके संचालनालय, पत्र क्रमांकः एसबी.१/ब.२/२०१४/२६५९९, दि. ११/०९/२०१४.

**शासन आदेश**

बाष्पके संचालनालयातील तांत्रिक अधिकारी (गट-ब) (राजपत्रित)या पदाचे सेवाप्रवेश नियम अंतिम होऊन त्याबाबतची अधिसूचना निर्गमित होईपर्यंत सदर पद तात्पुरत्या पदोन्नतीने ११-११ महिन्यांसाठी भरण्यास सामान्य प्रशासन विभागाने दिनांक २१/१/२०१३ रोजी मान्यता दिली होती. त्या अनुषंगाने संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये बाष्पके संचालनालयातील श्री.श.बा.चव्हाण, वरिष्ठ तंत्र सहाय्यक यांना दिनांक ०१/०४/२०१३ पासून ११ महिन्याच्या कालावधीसाठी तांत्रिक अधिकारी (गट-ब) (राजपत्रित)या पदावर तात्पुरत्या स्वरुपात पदोन्नती दिली होती. सदर पदोन्नतीचा कालावधी दिनांक २८/०२/२०१४ रोजी संपूष्टात आल्यानंतर संदर्भ क्र२ येथील शासन निर्णयान्वये दिनांक ०१/०३/२०१४ चा तांत्रिक खंड व दिनांक ०२/०३/२०१४ च्या सुट्टीच्या दिवसाचा खंड देऊन श्री.श.बा.चव्हाण यांची तांत्रिक अधिकारी, (गट-ब) (राजपत्रित)या पदावरील पदोन्नती दिनांक ०३/०३/२०१४ पासून ११ महिन्यांसाठी सुरु झाली. दरम्यान तांत्रिक

अधिकारी (गट-ब) (राजपत्रित)या पदाचे सेवाप्रवेश नियम, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र. एसबीई-१०२००४/प्र.क्र.१६०२/कामगार-१, दिनांक २१/०७/२०१४ अन्वये अधिसूचित झाले आहेत. त्यामुळे श्री.श.बा.चव्हाण यांना तांत्रिक अधिकारी (गट-ब) (राजपत्रित) या पदावर महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मान्यतेच्या अधीन राहून दिनांक २१/०७/२०१४ पासून नियमित पदोन्नती देण्यात येत आहे.

२. प्रस्तुत शासन आदेश, सामान्य प्रशासन विभागाच्या मान्यतेने आणि त्यांच्या अनौ. संदर्भ क्र. १९२४/का-१२, दिनांक १३/११/२०१४ अन्वये प्राप्त सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक २०१५०२१८१२४२१४८७१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Khavnekar Jayashree A

Digitally signed by Khavnekar Jayashree A
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industry energy & labour department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Khavnekar Jayashree A
Date: 2015.02.18 12:51:58 +05'30'

**( ज. आ. खवणेकर)**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

प्रभारी संचालक, बाष्पके संचालनालय, कामगार भवन, ७ वा मजला, प्लॉट नं.सी-२०, ब्लॉक नं.ई, बांद्रा-कुर्ला संकुल, बांद्रे (पू.) मुंबई-४०० ०५१.

**प्रत,**

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
२) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
३) अधिदान व लेखा अधिकारी, वांद्रे (पूर्व) मुंबई.
४) सामान्य प्रशासन विभाग, (कार्यासन-१२), मंत्रालय, मुंबई.
५) श्री.श.बा.चव्हाण,तांत्रिक अधिकारी, (गट-ब) (राजपत्रित), बाष्पके संचालनालय,मुंबई
६) प्रधान सचिव (कामगार) यांचे स्वीय सहाय्यक, उ.ऊ. व का.वि., मंत्रालय, मुंबई.
७) निवडनस्ती (कामगार-१) उ.ऊ. व का.वि., मंत्रालय, मुंबई.